“भारतरत्न डॉ. ए. पी. जे. अब्दुल कलाम अमृत आहार” योजनेंतर्गत अंगणवाडयांना स्वयंपाकासाठी गॅस सिलेंडर्सकरिता निधी उपलब्ध करुन देण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन
## आदिवासी विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः आविवि-२०१५/प्र.क्र.१०७ (भाग २)/कार्यासन-८

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : १० नोव्हेंबर, २०१६

वाचा : १) शासन निर्णय क्रमांक:टिएसपी-१०८६/८७१०/प्र.क्र.३१/का-५, दिनांक : ०९ मार्च, १९९०
२) शासन निर्णय क्रमांक : केंद्रिय२००५/प्र.क्र.९६/का.१७, दिनांक ४ ऑक्टोबर,२००६
३) शासन निर्णय क्रमांक : आविवि-२०१५/प्र.क्र.७८/का-८, दिनांक : १८ नोव्हेंबर, २०१५
४) शासन निर्णय क्रमांक : आविवि-२०१५/प्र.क्र.७८/का-८, दिनांक : ३० नोव्हेंबर, २०१५
५) शासन निर्णय क्रमांक : आविवि-२०१५/प्र.क्र.१०७ (भाग-२)/का-८, दिनांक १८ मार्च,२०१६
६) शासन निर्णय क्रमांक : आविवि-२०१६/प्र.क्र.६६/का-८, दिनांक ०२ ऑगस्ट, २०१६
७) शासन निर्णय क्रमांक : आविवि-२०१६/प्र.क्र.८३/का-८, दिनांक ०५ ऑगस्ट, २०१६
८) महाराष्ट्र राज्य सरकारी आदिवासी विकास महामंडळ ,नाशिक यांचे दिनांक ११ एप्रिल, २०१६ चे पत्र
९) शासन पत्र क्रमांक: आविवि-२०१५/प्र.क्र.१०७(२)/का.८, दिनांक ०२ मे,२०१६
१०) एच.पी.सी.एल. चा दिनांक १३ जून, २०१६ रोजी प्राप्त ई-मेल

प्रस्तावना :

अनुसूचित क्षेत्र व अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रातील गरोदर स्त्रियांना शेवटच्या तिमाही मध्ये व स्तनदा मातेस बाळंतपणानंतर पहिल्या तिमाही मध्ये एक वेळ चौरस आहार देण्यासाठी **“भारतरत्न डॉ. ए.पी.जे. अब्दुल कलाम अमृत आहार योजना”** संदर्भाधीन दि.१८ नोव्हेंबर, २०१५ च्या शासन निर्णयान्वये दि.१ डिसेंबर, २०१५ पासून सुरु करण्यात आली आहे. सदर योजनेची व्याप्ती वाढवून स्त्री गरोदर असल्याचे निश्चित झाल्यापासून बाळंतपणापर्यंत तसेच स्तनदा मातांना पहिले ६ महिने एक वेळ आहार देण्याचा निर्णय संदर्भांकित दि. २ ऑगस्ट, २०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये घेण्यात आलेला आहे. तर संदर्भांकीत दि. ०५ ऑगस्ट, २०१६ च्या शासन निर्णयान्वये ७ महिने ते ६ वर्ष वयोगटाच्या सर्व बालकांना अंडी/ केळी/ ऋतुमानानुसार फळे इ. चा अतिरिक्त आहार पुरविण्यासाठी टप्पा-२ राबविण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे.

२. महाराष्ट्र राज्य सहकारी आदिवासी विकास महामंडळामार्फत खरेदी करण्यात आलेल्या शेगड्यांपैकी वाटपाअभावी शिल्लक शेगडया वापरण्यायोग्य आहेत. या बाबीचा विचार करुन उपरोक्त योजनेंतर्गत आहार तयार करण्यासाठी सुस्थितीत असलेल्या शेगडया अंगणवाड्यांना उपलब्ध करुन देण्याबाबत दिनांक १८ मार्च, २०१६ च्या शासन निर्णयानुसार सुचना देण्यात आलेल्या आहेत.

३. अंगणवाड्यांना उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या गॅस शेगडयांना गॅस सिलेंडरसाठी येणा-या खर्चापोटी आवश्यक निधी उपलब्ध करुन द्यावयाचा आहे. आदिवासी विकास महामंडळाकडे शिल्लक गॅस शेंगड्या व त्यासाठी आवश्यक गॅस सिलेंडर, रेग्युलेटर, करारनामा इत्यादी साठी निधी शिल्लक आहे. त्याअनुषंगाने गॅस शेगड्यासोबतच अंगणवाड्यांना गॅस सिलेंडर, रेग्यूलेटर, करारनामा इ. साठी आदिवासी विकास महामंडळाकडे शिल्लक असलेला निधी उपलब्ध करुन देण्याबाबत आदिवासी विकास महामंडळाने संदर्भाधिन क्र.८ अन्वये शासनास प्रस्ताव सादर केला आहे. भारतरत्न डॉ.ए.पी.जे.अब्दुल कलाम अमृत आहार योजनेंतर्गत गठीत राज्यस्तरीय संनियंत्रण समितीच्या दिनांक २६ एप्रिल, २०१६ रोजी झालेल्या बैठकीमध्ये अंगणवाड्यांना उपलब्ध करून द्यावयाच्या सिलेंडर व रेग्युलेटर्स हे थेट हिंदुस्तान पेट्रोलियम कॉर्पोरेशन लि. (एच.पी.सी.एल.) या कंपनीकडून घेण्याबाबत निर्णय घेण्यात आला होता.

४. त्याअनुषंगाने अंगणवाड्यांची विस्तृत यादी आयुक्त, एकात्मिक बालविकास सेवा यांचेकडून एच.पी.सी.एल. कंपनीला उपलब्ध करून देण्यात आली. त्याअनुषंगाने, एच.पी.सी.एल. ने अंगणवाडी निहाय गॅस सिलेंडर वितरकांची यादी आयुक्त, एकात्मिक बालविकास सेवा यांना उपलब्ध करून दिलेली आहे. तसेच अंगणवाड्यांना उपलब्ध करून द्यावयाच्या सिलेंडर, रेग्युलेटर्ससाठी अनामत रक्कम, सुरक्षा पाईप, डिजीसीसी पुस्तक, चाचणी शुल्क व मुद्रांक शुल्क इत्यादीसाठी आवश्यक शुल्काचा प्रस्ताव संदर्भाकीत क्र.१० वरील ई-मेलनुसार एच.पी.सी.एल. कंपनीने शासनास सादर केलेला आहे. त्याअनुषंगाने अंगणवाड्यांना उपलब्ध करून द्यावयाच्या सिलेंडर,रेग्युलेटर्स, सुरक्षा पाईप, डिजीसीसी पुस्तक, चाचणी शुल्क व मुद्रांक शुल्क एच.पी.सी.एल. कंपनीस अदा करण्यासाठी आवश्यक निधी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा यांना उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :

१) अनुसूचित क्षेत्र व अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रातील अंगणवाड्यांना दि.१८ मार्च, २०१६ अन्वये गॅस शेगडया उपलब्ध करुन देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. भारतरत्न डॉ. ए.पी.जे. अब्दुल कलाम अमृत आहार योजनेंतर्गत असलेल्या १३५९३ अंगणवाडयांना उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे. त्यानुषंगाने अंगणवाडयांना २ गॅस सिलेंडर व रेग्युलेटरसाठी अनामत रक्कम, सुरक्षा पाईप, डिजीसीसी पुस्तक, चाचणी शुल्क व मुद्रांक शुल्क याकरिता एच.पी.सी.एल. कंपनीकडून प्राप्त प्रस्तावानुसार रु.४,६७,५९,९२०/- इतक्या खर्चास मान्यता देण्यात येत आहे. उपरोक्त बाबींसाठी दरांचे विवरण परिशिष्ट-१ मध्ये दर्शविल्या नुसार राहील.

२) वरीलप्रमाणे १३५९३ अंगणवाडयांना उपलब्ध करुन देण्यात आलेल्या शेगडयांसाठी २ गॅस सिलेंडर व रेग्युलेटरसाठी अनामत रक्कम, सुरक्षा पाईप, डिजीसीसी पुस्तक, चाचणी शुल्क व मुद्रांक शुल्क याकरिता आवश्यक रु. ४,६७,५९,९२०/- इतका निधी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांना उपलब्ध करुन देण्यात यावा.

३) अंगणवाडयांना २ गॅस सिलेंडर व रेग्युलेटरसाठी अनामत रक्कम, सुरक्षा पाईप, डिजीसीसी पुस्तक, चाचणी शुल्क व मुद्रांक शुल्क अदा करण्यासाठी आदिवासी विकास महामंडळाने त्यांचेकडील उपलब्ध अखर्चित निधीमधून रु. ३,७४,७८,८५७/- इतका निधी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना,नवी मुंबई यांना उपलब्ध करुन देण्यात यावा. तर उर्वरित रू. ९२,८१,०६३/- निधी शासनाकडून आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, नवी मुंबई यांना उपलब्ध करून देण्यात यावा.

४) यापैकी २ गॅस सिलेंडर व रेग्युलेटरसाठी अनामत रक्कमेपोटी रु. ४,१४,५८,६५०/- इतका निधी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांनी एच.पी.सी.एल. कंपनीस थेट वितरित करावा.

५) तर सुरक्षा पाईप, डिजीसीसी पुस्तक, चाचणी शुल्क व मुद्रांक शुल्क हे क्षेत्रिय एच.पी.सी.एल.च्या वितरकांना अदा करावयाचे असल्याने रु.५३,०१,२७०/- एवढा निधी आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना यांनी अंगणवाडयांना आहार समितीच्या खात्यात वरील बाबींसाठी एचपीसीएलने विहित केलेल्या दरानुसार क्षेत्रिय गॅस वितरकांना शुल्क अदा करण्यासाठी वितरित करावा. सदर दरपत्रक सोबतच्या परिशिष्ट- १ मध्ये जोडलेले आहे. शासन स्तरावर गॅस सिलेंडर व रेग्युलेटरसाठी अनामत रक्कम एच.पी.सी.एल. कंपनीला अदा करण्यात येत असल्याने अंगणवाडी स्तरावरुन सोबतच्या दरपत्रकातील क्र. ३ ते ६ केवळ या बाबींसाठी वितरकांना शुल्क विहित दरानुसार अदा करावयाचे आहे.

२. उपरोक्त निर्णयाच्या अनुषंगाने आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा यांनी खालील नमूद कार्यपध्दती व मार्गदर्शक तत्त्वे अवलंबून कार्यवाही करावी.

१) लाभार्थी अंगणवाडयांना एच.पी.सी.एल. कंपनीने प्रस्तावित केलेले वितरक अंगणवाड्यांना सेवा देऊ शकतील याची खातरजमा करण्यात यावी, अथवा एच.पी.सी.एल.ला संपर्क करून योग्य वितरक निश्चित करून घ्यावा. याबाबत प्रकल्प अधिकारी, एकात्मिक बाल विकास सेवा योजना आणि उप मुख्य कार्यकारी अधिकारी (बाल कल्याण) यांना सुचना देण्यात याव्यात.

२) भारतरत्न डॉ.ए.पी.जे. अब्दुल कलाम अमृत आहार योजनेंतर्गत लाभार्थी अंगणवाड्यांमध्ये एच.पी.सी.एल.ने विहित केलेल्या वितरकाकडून गॅस सिलेंडर जोडणी त्वरीत उपलब्ध होईल यासाठी क्षेत्रिय अधिकारी व अंगणवाडी सेविकांना सुचना देण्यात याव्यात. तसेच अंगणवाडी सेविका व मदतनिस यांना गॅस वापरणे व सुरक्षेबाबतचे प्रशिक्षण संबंधित वितरकाकडून आयोजित करावे.

३) एच.पी.सी.एल.च्या गॅस वितरकाकडून गॅस सिलेंडर जोडणीसंदर्भात वेळोवेळी उद्भवणाऱ्या तक्रारीचेही निवारण करतील याबाबत पाठपूरावा करण्यात यावा.

४) अंगणवाड्यांना गॅस सिलेंडर्सच्या पुर्नभरणाचा खर्च हा या योजनेंतर्गत इंधनासाठी उपलब्ध करुन देण्यात आलेल्या तरतुदीतून करावयाचा आहे. याबाबत आवश्यक मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात याव्यात.

५) या अंगणवाड्यांना गॅस सिलेंडर अनुदान आहार समितीच्या बँक खात्यामध्ये जमा होईल याची खातरजमा करावी त्यासाठी अंगणवाडी व आहार समितीच्या बँक खात्याची माहिती एच.पी.सी.एल. ला उपलब्ध करून द्यावी.

६) अंगणवाड्यांना उपलब्ध करुन देण्यात आलेल्या गॅस युनिटची विक्री/हस्तांतर करता येणार नाही.

सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१९२/व्यय-१४, दि. २१/१०/२०१६ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१११०१४०९५७६९२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Laxmikant G Dhoke

Digitally signed by Laxmikant G Dhoke
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Laxmikant G Dhoke
Date: 2016.11.10 14:13:47 +05'30'

(ल.गो.ढोके)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
४) मा.मंत्री (महिला व बाल विकास) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
५) मा.मंत्री (सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
६) मा.मंत्री ( अन्न व नागरी पुरवठा ) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
७) मा.राज्यमंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
८) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई.
९) सर्व मा. संसद सदस्य,
१०) सर्व मा. विधानसभा /विधानपरिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ.
११) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.

१२) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५) प्रधान सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) सचिव, आदिवासी विकास विभाग,मंत्रालय, मुंबई.
१८) सचिव, अन्न व नागरी पुरवठा विभाग,मंत्रालय, मुंबई
१९) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक
२०) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था ,पुणे
२१) व्यवस्थापकीय संचालक , महाराष्ट्र राज्य आदिवासी विकास महामंडळ, नाशिक .
२२) महासंचालक, राजमाता जिजाऊ पोषण मिशन, नवी मुबंई.
२३) आयुक्त, कुटुंब कल्याण,मंत्रालय, मुंबई.
२४) आयुक्त, एकात्मिक बाल विकास सेवा योजना, सी.बी.डी. बेलापूर, नवी मुंबई.
२५) संचालक, सार्वजनिक आरोग्य संचालनालय,मुंबई.
२६) सर्व विभागीय आयुक्त
२७) सर्व जिल्हाधिकारी
२८) युनिसेफ राज्यप्रमुख, मुंबई.
२९) स्वयंसेवी संस्थांचे प्रतिनिधी
३०) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (अनुसूचित क्षेत्र/सर्व आदिवासी जिल्हे)
३१) सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास
३२) सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
३३) मुख्य प्रबंधक, एल.पी.जी.सेल्स, जी.एम.ओ.पश्चिम क्षेत्र, हिंदुस्तान पेट्रोलियम कॉर्पोरेशन लि.मुंबई.
३४) सह संचालक, माहिती व प्रसिध्दी संचालनालय, मुंबई.
३५) सह संचालक, आरोग्य संचालनालय, मुंबई.
३६) सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद.
३७) उपमुख्य कार्यकारी अधिकारी, बाल कल्याण, जिल्हा परिषद.
३८) जिल्हा कोषागार अधिकारी (संबंधित जिल्हे)
३९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर.
४०) महालेखापाल (लेखापरिक्षा), मुंबई / नागपूर.
४१) वित्त विभाग (व्यय -१४), मंत्रालय, मुंबई -३२
४२) सर्व सहसचिव /उपसचिव, आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
४३) सर्व अवर सचिव /कक्ष अधिकारी, आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई-३२.
४४) निवड नस्ती -कार्यासन (८).

शासन निर्णय क्र.आविवि-२०१५/प्र.क्र.१०७(भाग-२)/का.०८,दि.१०.११.२०१६ चे सहपत्र

## परिशिष्ट-१

गॅस सिलेंडर व रेग्युलेटरसाठी अनामत रक्कम, सुरक्षा पाईप, डिजीसीसी पुस्तक, चाचणी शुल्क व मुद्रांक शुल्क याकरिता एच.पी.सी.एल. कंपनीकडून प्राप्त दर.

(शुल्क रूपयात)

| **अ.क्र.** | | **दोन सिलेंडर** | **१३५९३ अंगणवाड्यां-साठी दोन सिलेंडरचे शुल्क** | **शुल्क अदा करावयाची संस्था** |
|---|---|---|---|---|
| १ | सिलेंडरची अनामत रक्कम | २९०० | ३९४१९७०० | एचपीसीएल |
| २ | रेग्युलेटरची अनामत रक्कम | १५० | २०३८९५० | एचपीसीएल |
| ३ | सुरक्षा पाईप | १९० | २५८२६७० | वितरक |
| ४ | डीजीसीसी पुस्तिका | २५ | ३३९८२५ | वितरक |
| ५ | चाचणी | ७५ | १०१९४७५ | वितरक |
| ६ | मुद्रांक शुल्क | १०० | १३५९३०० | वितरक |
| | **एकुण** | **३४४०** | **४६७५९९२०** | |